राज्याच्या आकस्मिक निधीमधून छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्थेसाठी (सारथी) निधी उपलब्ध करून देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सीबीसी-१०/२०१८/प्र.क्र.६५/मावक**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: ०८ ऑक्टोबर, २०१८

**वाचा:-** १) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र.सीबीसी-१०/२०१७/ प्र.क्र.२/मावक, दि.०३/०१/२०१७.
२) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र.सीबीसी-१०/२०१७/ प्र.क्र.२/मावक, दि.०७/०४/२०१८.
३) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र.सीबीसी-१०/२०१७/ प्र.क्र.२/मावक, दि.०४/०६/२०१८.
४) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र.सीबीसी-१०/२०१७/ प्र.क्र.२/मावक, दि.२६/०९/२०१८.

**प्रस्तावना:-**

मराठा, कुणबी व शेती व्यवसायातील बहुजन समाज यांच्यासाठी छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (Chhatrapati Shahu Maharaj Research, Training & Human Development Institute (SARATHI)) या नावाने संस्था स्थापन करण्याचे प्रस्तावित असल्याने सदरची संस्था स्थापन करण्याच्या पूर्व तयारीसाठी शासनास मार्गदर्शन व शिफारस करण्यासाठी संदर्भाधीन क्र.१ च्या शासन निर्णयान्वये द्विसदस्यीय समिती गठीत करण्यात आली होती. सदर समितीने दि.२१/०४/२०१८ रोजी आपला अहवाल शासनास सादर केला असून शासन निर्णय दि.२६/०९/२०१८ अन्वये सदर अहवाल शासनाने तत्वत: स्वीकृत केला आहे. सदर संस्थेच्या नोंदणीकरणाची प्रक्रिया कंपनी अधिनियम, २०१३ च्या कलम ८ अंतर्गत दिनांक २५ जून, २०१८ रोजी पूर्ण करण्यात आली असून सदर संस्थेचा नोंदणीकरण क्र.१७७३९४ दि.२५.०६.२०१८ असा आहे. छत्रपती शाहू महाराज यांच्या जयंतीचे औचित्य साधून दि.२६ जुन, २०१८ रोजी छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी) पुणे येथे कार्यान्वित करण्यात आली आहे. सदर संस्था तातडीने कार्यान्वित करून संस्थेमार्फत सन २०१८-१९ वर्षात विविध कार्यक्रम राबविण्याकरीता व या संस्थेस नेमून दिलेली कामे पार पडण्यासाठी सदर संस्थेस आकस्मिक निधी उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

छत्रपती शाहू महाराज संशोधन प्रशिक्षण व मानव विकास संस्थेमार्फत मराठा, कुणबी, कुणबी-मराठा, मराठा-कुणबी समाजाच्या सामाजिक, आर्थिक व शैक्षणिक विकासाकरीता संचालक

मंडळाच्या मान्यतेने विविध योजना व उपक्रम राबविणे नियोजित आहे. तसेच सदर संस्थेसाठी प्रशासकीय खर्च, संचालक मंडळाने वेळोवेळी घेतलेल्या निर्णयानुसार खरेदी करावयाचे आवश्यक साहित्य किंवा प्रसंगी आवश्यक व्यवस्था निर्माण करणे, वेतन भत्ते, मानधन प्रवास देयके व भत्ता, प्रशिक्षण, कार्यशाळा, सेमीनार, चर्चासत्र, विविध स्पर्धा परीक्षा कोचिंग, मुल्यमापन, महिला सक्षमीकरण प्रकल्प, संशोधन, वैज्ञानिक जाणीव जागृती, साहित्य निर्मिती, प्रकाशन व प्रसिध्दी करीता विविध पुस्तकांचे भाषांतर, प्रकाशन व वाटप करणे, संचालक मंडळाच्या मान्यतेने इतर विशेष उपक्रम इत्यादी साठी व इतर अनुषंगिक खर्चाकरीता निधीची तात्काळ आवश्यकता असल्याने छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था, पुणे या संस्थेस आकस्मिक निधी उपलब्ध करून देणे आवश्यक आहे.

२. सदर संस्था तातडीने कार्यान्वित करून संस्थेमार्फत सन २०१८-१९ वर्षात विविध कार्यक्रम राबविण्याकरीता व या संस्थेस नेमून दिलेली कामे पार पडण्यासाठी व इतर अनुषंगिक कार्यवाहीकरीता होणारा खर्च भागविण्यासाठी रू.५,००,००,०००/- (रूपये पाच कोटी फक्त) इतकी रक्कम वित्त विभागाच्या मान्यतेने त्यांच्या ज्ञापन क्र.आकनि-२०१८/प्र.क्र.७/अर्थ-७ दि.०३ ऑक्टोबर,२०१८ अन्वये आकस्मिकता निधीमधून मंजूर करण्यात आलेली आहे. सदरहू रक्कम ज्या प्रयोजनार्थ अनुज्ञेय आहे त्याच प्रयोजनार्थ वापरण्यात यावी.

३. सदरहू खर्च "मागणी क्र. एन-०३, २२२५, अनुसुचित जाती, अनुसुचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्याक यांचे कल्याण, (०३) मागासवर्गांचे कल्याण, १०२ आर्थिक विकास, (०३) इतर मागासवर्गांचे कल्याण, (०३)(०१) छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी) (कार्यक्रम) (२२२५ एफ१४७), (३१) सहायक अनुदाने (वेतनेतर),(३६) सहायक अनुदाने (वेतन)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. सदर निधी ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) या उद्दिष्टाखाली रु.३.५० कोटी आणि ३६-सहायक अनुदाने (वेतन) या उद्दिष्टाखाली रु.१.५० कोटी असा वर्गीकृत करण्यात आलेला आहे. सदर खर्च शासन ज्ञापन क्र.आकनि-२०१८/प्र.क्र.७/अर्थ-७ दि.०३ ऑक्टोबर, २०१८ अन्वये आकस्मिकता निधीमधून मंजूर (आकस्मिकता निधी संकेतांक ८००० ७५११) करण्यात आलेल्या रू.५,००,००,०००/- (रूपये पाच कोटी फक्त) एवढ्या अग्रिमातून भागविण्यात यावा.

४. आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे (नियंत्रण अधिकारी) यांनी, आकस्मिकता निधीमधून खर्च करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकाऱ्याकडे रक्कम सुपूर्द करण्यासंबंधीच्या आदेशात/पत्रात आगाऊ रकमेतून खर्च करताना सादर करण्यात येणाऱ्या देयकावर आकस्मिकता निधी अग्रिम- वित्त विभाग, शासन ज्ञापन क्र.आकनि-२०१८/प्र.क्र.७/अर्थ-७ दि.०३ ऑक्टोबर, २०१८ अन्वये मंजूर असे लाल शाईने लिहावे अशी स्पष्ट सूचना त्या आदेशात/पत्रात अंतर्भूत करावी व ही सुचना लाल शाईने अधोरेखित करावी. याबाबतचे विवरणपत्र वित्त विभाग, सह संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई व या विभागास पाठवावे. सदर मंजूर केलेले रू.५,००,००,०००/- (रूपये पाच कोटी फक्त) छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था, पुणे यांचेकडे त्वरित सुपूर्द करण्यासाठी संशोधन अधिकारी, महाराष्ट्र राज्य मागासवर्ग आयोग, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर प्रकरणी छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था, पुणे यांनी प्रस्तावित केलेला खर्च विहित वित्तीय नियमाच्या आधारे छाननी करून अदा करावा. विहित वित्तीय नियमाचे पालन करण्याची जबाबदारी छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था, पुणे यांची राहील. आकस्मिकता निधीतील अग्रीमाचा खर्च अर्थसंकल्प नियमावली व वित्तीय अधिकार नियमावली मध्ये नमूद मार्गदर्शक तत्वानुसार खर्च करावा. खर्चाच्या बाबी व त्यांच्या दरासंबंधी सविस्तर छाननी करून शासनाच्या विहित नियमानुसार आवश्यक तेवढाच खर्च करण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३६०/२०१८/व्यय-१४, दि.१७/०९/२०१८ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१००८१७२५४८९३२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dinesh Ramchandra Dingle

Digitally signed by Dinesh Ramchandra Dingle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice And Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8612f2011cf8cde3b074d561cd711c17c6c3fd836467a8648a8d21dc84bc01be, cn=Dinesh Ramchandra Dingle
Date: 2018.10.08 17:27:46 +05'30'

**(दि.रा.डिंगळे)**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
३. मा.मंत्री (महसूल तथा अध्यक्ष, मराठा आरक्षणासंदर्भात गठीत मंत्रिमंडळ उपसमिती) यांचे खाजगी सचिव
४. मा. मंत्री (सामाजिक न्याय ) यांचे खाजगी सचिव
५. मा. राज्यमंत्री (सामाजिक न्याय) यांचे खाजगी सचिव
६. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-एक, महाराष्ट्र, मुंबई
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-दोन, महाराष्ट्र, नागपूर.
८. वरिष्ठ लेखाधिकारी, प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-एक, व्ही.एल.सी. (एएसी) शाखा, यांचे कार्यालय, महाराष्ट्र, मुंबई
९. वरिष्ठ लेखाधिकारी, महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-दोन, व्ही.एल.सी. (एएसी) शाखा, यांचे कार्यालय, महाराष्ट्र, नागपूर
१०. महालेखापाल, (लेखापरीक्षा)-एक, महाराष्ट्र, मुंबई
११. महालेखापाल, (लेखापरीक्षा)-दोन, महाराष्ट्र, नागपूर
१२. अधिदान व लेखाअधिकारी, मुंबई
१३. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई

१४. सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, ५ वा मजला, नवीन प्रशासन भवन, मंत्रालयासमोर, मुंबई
१५.आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१६. छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था, पुणे
१७. संशोधन अधिकारी, महाराष्ट्र राज्य मागासवर्ग आयोग, पुणे
१८. वित्त विभाग (व्यय-१४/अर्थसंकल्प-३/अर्थसंकल्प-७), मंत्रालय, मुंबई
१९. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
२०. निवड नस्ती, का-मावक